पूर्व विदर्भातील नागपूर, भंडारा, चंद्रपूर, गडचिरोली व गोंदिया जिल्हयांमध्ये कृषीपंपाच्या विद्युत पायाभूत सुविधांचे बळकटीकरण, श्रेणीवर्धन, सक्षमीकरण तसेच या पाच जिल्हयांमध्ये पैसे भरुन वीज जोडणीकरिता प्रलंबित व संभाव्य कृषीपंप वीज जोडणीबाबत निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग

**शासन निर्णय क्रमांक : संकिर्ण-२०१६/प्र.क्र.४३१/ऊर्जा-५**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक : २७ फेब्रुवारी, २०१७.

<u>संदर्भ</u> : १. महावितरण कंपनीचे पत्र क्र.मु.अ.(वितरण)/ग्रावि/कृषीपंप/१९२०८ दिनांक १७ जून, २०१६.

२. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.एससीवाय-११/ /२०१६/प्र.क्र.८६/ म-११, दिनांक १ डिसेंबर, २०१६.

३. वित्त विभाग, शासन परीपत्रक क्र. अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.२०/४/२०१६ व दि.०८/२/२०१७

**प्रस्तावना :-**

मागील वर्षाच्या राज्यातील दुष्काळी परिस्थितीच्या पार्श्वभूमीवर, सन २०१५ च्या हिवाळी अधिवेशनाच्या कालावधीत मा.मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखाली विधानभवन, नागपूर येथे विदर्भातील ११ जिल्हयांच्या आढावा बैठका घेण्यात आल्या. सदर बैठकांच्या इतिवृत्तांवर केलेल्या कार्यवाहीबाबतचा आढावा दिनांक ४ एप्रिल, २०१६ रोजी मा.मुख्यमंत्री महोदयांनी व्हिडीयो कॉन्फरन्सव्दारे घेतला. त्यावेळी नागपूर विभागातील गडचिरोली, चंद्रपूर, भंडारा, नागपूर व गोंदिया जिल्हयात घेण्यात येणाऱ्या विहिरींची संख्या कमी असल्याचे दिसून आले. या पाच जिल्हयात पाण्याची पातळी चांगली असूनही विहिरीची संख्या कमी असल्याने सिंचनाची सुविधा कमी प्रमाणात आहे. या पाच जिल्हयात उपलब्ध पाण्याची पातळी विचारात घेता या ठिकाणी शेततळी घेण्यापेक्षा जास्तीत जास्त प्रमाणात विहिरी घेण्यात याव्यात, असे जिल्हाधिकारी, गडचिरोली यांनी मा.मुख्यमंत्री महोदयांचे निदर्शनास आणले. त्यास अनुसरुन, गडचिरोली, चंद्रपूर, भंडारा, नागपूर व गोंदिया या पाच जिल्हयांमध्ये सिंचन विहीरींचा कार्यक्रम घेण्यात यावा. तसेच सदर कार्यक्रमासाठी लागणारा निधी योजनेत्तर "Draught Mitigation Measures" अंतर्गत मदत व पुनर्वसन विभागामार्फत उपलब्ध करुन घेण्यात यावा, असे निर्देश मा.मुख्यमंत्री महोदयांनी आढावा बैठकीचे वेळी दिले.

२. त्यानुषंगाने सन २०१६-१७ या वर्षाच्या अर्थसंकल्पात महसूल व वन विभागांतर्गत (मदत व पुनर्वसन मागणी क्र.सी-६,४२५०, इतर सामाजिक सेवांवरील भांडवली खर्च या योजनेत्तर योजनेखाली मागेल त्याला शेततळे - रुपये ५०० कोटी, विहिरी तयार करणे - रुपये ७५० कोटी, वीजपंप विद्युत जोडणी व पायाभूत सुविधा व इतर अनुषंगिक बाबी - रुपये ७५० कोटी अशाप्रकारे एकूण रुपये २००० कोटी इतकी तरतूद करण्यात आली आहे.

३. पूर्व विदर्भातील नागपूर, भंडारा, चंद्रपूर, गडचिरोली व गोंदिया या पांच जिल्हयांमध्ये सन २०१४-१५ व सन २०१५-१६ या वर्षामध्ये ४४९४१ इतक्या कृषीपंपाना अस्तित्वात असलेल्या वीज वितरण प्रणालीमधून वीज जोडण्या दिल्या आहेत. यामुळे वीज वितरण प्रणालीवर ताण पडून वीज पुरवठा वारंवार खंडीत होत आहे. यामुळे या वीज वितरण प्रणालीचे सक्षमीकरण, बळकटीकरण व श्रेणीवर्धन करणे आवश्यक आहे. यासाठी सुमारे रुपये ४००.८१ कोटी इतक्या निधीची आवश्यकता आहे. त्याचप्रमाणे उपरोक्त पूर्व विदर्भातील नागपूर, भंडारा, चंद्रपूर, गडचिरोली व गोंदिया या पांच जिल्हयांमधील प्रलंबित व संभाव्य २७००० कृषीपंपाचे विद्युतीकरण करण्यासाठी सुमारे रुपये ३४८.९१ कोटी इतक्या निधीची आवश्यकता आहे.

त्यानुषंगाने पूर्व विदर्भातील नागपूर, भंडारा, चंद्रपूर, गडचिरोली व गोंदिया या पांच जिल्हयांमधील कृषीपंप वीज वितरण प्रणालीचे सक्षमीकरण, बळकटीकरण व श्रेणीवर्धन करणे तसेच या पांच जिल्हयांमधील प्रलंबित व संभाव्य २७००० कृषीपंपाचे विद्युतीकरण करण्याचा संदर्भ क्र.१ येथील महावितरण कंपनीचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**४. <u>शासन निर्णय</u> :-**

(१) पूर्व विदर्भातील जिल्हयांमध्ये सोबतच्या **परिशिष्ट - अ** व **ब** मध्ये नमूद केल्याप्रमाणे “वीजपंप विद्युत जोडणी व पायाभूत सुविधा व इतर अनुषंगिक बाबी” अंतर्गत कामे करण्यासाठी रुपये ७५० कोटी इतक्या तरतुदीपैकी रुपये ३५० कोटी सन २०१६-१७ या वर्षात उपरोक्त शासन निर्णय क्र.२ दिनांक १ डिसेंबर, २०१६ अन्वये महसूल व वन विभागाने जलसंधारण विभागास वर्ग केले असून, जलसंधारण विभागाने ती तरतूद अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर ऊर्जा विभागास वर्ग केली आहे. सदर वर्ग केलेली रक्कम रुपये ३५० कोटी (रुपये तीनशे पन्नास कोटी फक्त) एवढी तरतूद महावितरण कंपनीस अनुदान स्वरुपात वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. सदरची रक्कम अधिदान व लेखा अधिकारी यांच्यामार्फत कोषागारातून काढून महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्या.(महावितरण) यांना अदा करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून श्री वि.म. राजुरकर, अवर सचिव व नियंत्रण अधिकारी म्हणून श्री भि.य.मंता, उपसचिव, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

(२) सदर खर्च मागणी क्र.सी-६, ४२५०, इतर सामाजिक सेवांवरील भांडवली खर्च, ०० इतर सामाजिक सेवावरील भांडवली खर्च, १०१ , नैसर्गिक आत्पत्ती (००)(००)(०४) दुष्काळ प्रतिबंधक उपाययोजना या अंतर्गत वीजपंप विद्युत जोडणी व पायाभूत सुविधा व इतर अनुषंगिक बाबी (४२५० ए ०३०४)३१, सहायक अनुदान (वेतनेतर) या उपलेखाशीर्षाखाली सन २०१६-१७ करिता मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

(३) सदर निधीमधून केलेल्या कामांचा आढावा महावितरण कंपनीने त्यांच्या स्तरावर दर तीन महिन्याने घेऊन शासनास अहवाल सादर करावा.

(४) या लेखाशीर्षाखाली उद्योग, ऊर्जा व कामगार विभागामार्फत प्रथमच निधी वितरीत करण्यात येत आहे. त्यामुळे यापूर्वीचे कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

(५) वित्त विभागाच्या दिनांक २० एप्रिल, २०१६ च्या परिपत्रकान्वये अर्थसंकल्प अंदाज वितरण प्रणाली व संनियंत्रण प्रणालीवर उपलब्ध असलेला निधी कोषागारातून आहरित करण्यापूर्वी या परिपत्रकासोबतच्या परिशिष्टात नमूद केलेल्या बाबीसाठी तपासणी सूचीप्रमाणे सर्व बाबींची तसेच परिपत्रक ७ ते १८ मधील प्रत्येक अटीची व परिशिष्टातील अनुक्रमांक ३ व ९ मधील

अटींची पूर्तता होत असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे. तसेच वित्त विभागाच्या ०८/०२/२०१७ च्या परिपत्रकातील परि. २ ते ५ ची पूर्तता होत असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

(६) सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या क्र.अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.२०/४/२०१६ व दि.८/२/२०१७ च्या परीपत्रकामध्ये मंत्रालयीन विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारात प्रधान सचिव (उर्जा) यांच्या मान्यतेने व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.: १५/२०१७, दिनांक ३१/०१/२०१७ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

(७) हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in यासंकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१७०३०११२५३२१८३१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Bhimashankar Yallappa Manta

Digitally signed by Bhimashankar Yallappa Manta
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industries,Energy And Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=873ce9a279d9561ff0cbf658e05b823c67c79dcac309fc4ebdac035d6aeec2a0, cn=Bhimashankar Yallappa Manta
Date: 2017.03.01 12:55:41 +05'30'

**( भि.य.मंता )**
**शासनाचे उपसचिव**

**प्रत-**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा.मंत्री (ऊर्जा) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा.राज्यमंत्री (ऊर्जा) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. उर्वरित सर्व मा.मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद / विधानसभा, विधानभवन, मुंबई
७. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
८. अप्पर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई
९. प्रधान सचिव (व्यय), मंत्रालय, मुंबई
१०. सर्व मंत्रालयीन विभाग
११. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परीक्षा )महाराष्ट्र-१, मुंबई ४०० ०२०.
१२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र-२, नागपूर
१३. अधिदान व लेखा अधिकारी, (अराप/रालेवि-१), मुंबई
१४. अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई
१५. निवासी लेखाधिकारी, अधिदान व लेखाअधिकारी, मुंबई
१६. अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनी, प्रकाशगड, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१
१७. वित्त विभाग (अर्थसं/व्यय-१६), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१८. अवर सचिव (ऊर्जा-३), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
१९. कक्ष अधिकारी (ऊर्जा-५), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२०. सर्व कार्यासने ( ऊर्जा), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२१. निवडनस्ती- ऊर्जा-५

## उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग

शासन परिपत्रक क्रमांक : संकिर्ण-२०१६/प्र.क्र.४३१ /ऊर्जा-५ दिनांक : २७ फेब्रुवारी, २०१७ चे सहपत्र.

**परिशिष्ट- अ**

**पूर्व विदर्भातील नागपूर, भंडारा, चंद्रपूर, गडचिरोली व गोंदिया या पांच जिल्हयांमध्ये कृषीपंपांच्या वीज वितरण प्रणालीचे सक्षमीकरण, बळकटीकरण व श्रेणीवर्धन करणेकरिता कामाचा तपशील.**

| अ. क्र. | कामाचा तपशील | परिमाण | संख्या | अंदाजित खर्च (रु. कोटी) |
|---|---|---|---|---|
| | **अ) सक्षमीकरणाची कामे** | | | |
| १ | अतिरीक्त पॉवर ट्रान्सफार्मर बसविणे | नग | ७ | ७.०८ |
| २ | पॉवर ट्रान्सफार्मरची क्षमता वाढविणे | नग | १४ | ७.७२ |
| ३ | वाहिनीचे विलगीकरण करणे | किमी | १३४ | ५.५२ |
| ४ | अतिरीक्त वितरण रोहीत्र बसविणे | नग | ११२९ | ३१.२८ |
| ५ | उच्चदाब वाहिनी | किमी | ४३२० | १७८.०५ |
| ६ | लघुदाब वाहिनी | किमी | १४५४ | ४०.०८ |
| | **एकूण -** | | | **२६९.७६** |
| | **ब) नुतनीकरण व आधुनिकीकरण** | | | |
| १ | उपकेंद्रातील ब्रेकर बदलणे | नग | ७१ | ३.१२ |
| २ | रोहीत्रांची अर्थींग करणे | नग | ८५५० | ६.७८ |
| ३ | उच्चदाब खांबांची अर्थींग करणे | नग | ३७३९ | ०.३३ |
| ४ | लघुदाब खांबांची अर्थींग करणे | नग | १०६०३३ | ०.८८ |
| ५ | उच्चदाब वाहिनीची गार्डींग बदलणे | नग | ३७४ | ११.३९ |
| ६ | लघुदाब वाहिनीची गार्डींग बदलणे | नग | ५३०२ | ९८.७७ |
| ७ | ६३ केव्हीए डिस्ट्रीब्युशन बॉक्स बदलणे | नग | ४६०० | १२.७२ |
| ८ | १०० केव्हीए डिस्ट्रीब्युशन बॉक्स बदलणे | नग | ४२०० | १२.०८ |
| ९ | उच्चदाब केबल बदलणे | मीटर | १८०० | ३४.४२ |
| १० | १८५ स्वे.मी.मी.लघुदाब केबल बदलणे | मीटर | ८५१३ | ५७ |
| ११ | १२० स्वे.मी.मी.लघुदाब केबल बदलणे | मीटर | २१००० | १.०३ |
| १२ | उच्चदाब वाहिनीसाठी अतिरीक्त खांब उभा करणे | नग | ३५८४ | ८.८५ |
| १३ | लघुदाब वाहिनीसाठी अतिरीक्त खांब उभा करणे | नग | ७३१८९ | ७२.९८ |
| १४ | उच्चदाब स्टे सेट बसविणे | नग | ७७ | ०.९४ |
| १५ | लघुदाब स्टे सेट बसविणे | नग | ६५६८९ | ६.०७ |
| | **एकूण -** | | | **१३१.०५** |
| | **एकूण ( अ + ब ) =** | | | **४००.८१** |

## उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग

शासन परिपत्रक क्रमांक : संकिर्ण-२०१६/प्र.क्र.४३१/ऊर्जा-५ दिनांक : २७ फेब्रुवारी, २०१७ चे सहपत्र.

### परिशिष्ट- ब

**पूर्व विदर्भातील नागपूर, भंडारा, चंद्रपूर, गडचिरोली व गोंदिया या पांच जिल्हयांमधील प्रलंबित व संभाव्य २७००० कृषीपंपाचे विद्युतीकरण करण्यासाठी कामाचा तपशील.**

| अ. क्र. | जिल्हयांची नांवे | कृषीपंपाची संख्या | स्तंभ क्र.३ मधील कृषीपंपाच्या ऊर्जिकरणाकरिता आवश्यक पायाभूत सुविधा | एकूण रक्कम (रु.कोटी) | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | रोहित्र (संख्या) | उच्चदाब वाहिनी (कि.मी.) | लघुदाब वाहिनी (कि.मी.) | नविन उपकेंद्र | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| १ | नागपूर | ६००० | ६० | ३० | ८८.२ | ० | ५८.२४ |
| २ | भंडारा | ५००० | ५० | २५ | ७३.५ | ० | ४८.५४ |
| ३ | गोदिया | ५००० | ५० | २५ | ७३.५ | ० | ४८.५४ |
| ४ | चंद्रपूर | ६००० | ६० | ३० | ८८.२ | ६ | १०५.६० |
| ५ | गडचिरोली | ५००० | ५० | २५ | ७३.५ | ५ | ८८.०० |
| | **एकूण :** | **२७०००** | **२७०** | **१३५** | **३९६.९** | **११** | **३४८.९१** |

-----------xxx------------